**कुटुंब निवृत्तीवेतनधारकाचे कुटुंब निवृत्तीवेतन संयुक्त बॅक खात्यात जमा करण्यास मान्यता देण्याबाबत......**

# महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.१५७/१९/कोषा-प्रशा५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १४ नोव्हेंबर, २०१९

**वाचा** : १)वित्त विभाग, शासन निर्णय क्र.निवेयो-१००७/प्र.क्र.१२०/कोषा प्र-५, दि.१८ ऑगस्ट,२००८
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००५/प्र.क्र.१९६/कोषा प्र-५, दि.१२ डिसेंबर,२००७
३) वित्त विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.संकीर्ण-१०.०५/प्र.क्र.१९६/कोषा प्र-५, दि.४ जुलै, २००८

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र २.च्या शासन निर्णयान्वये निवृत्तीवेतनधारकाचे मासिक निवृत्तीवेतन जमा करण्यासाठी निवृत्तीवेतन धारक व त्याचा/तीचा पती/ पत्नी यांचे नांवे संयुक्त बँक खाते उघडण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. परंतु सदर खात्याद्वारे केवळ निवृत्तीवेतन धारक हयात असेपर्यंतच त्याला मासिक निवृत्तीवेतनाची रक्कम प्रदान करण्यात येते. निवृत्तीवेतन धारकाच्या निधनानंतर कुटुंब निवृत्तीवेतन धारकास स्वतंत्र निवृत्तीवेतन बँक खाते उघडावे लागते. कुटुंब निवृत्तीवेतन धारकाचा त्रास कमी करण्याच्या उद्देशाने त्याचे नवीन बँक खाते न उघडता निवृत्तीवेतन धारकाचे निवृत्तीवेतन ज्या संयुक्त बँक खात्यात जमा होत होते त्याच संयुक्त बँक खात्याद्वारे कुटुंबनिवृत्तीवेतन धारकाचे कुटुंबनिवृत्तीवेतन देखील प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. निवृत्तीवेतन धारकाचा मृत्यू झाल्यास इतर सर्व सोपस्कार पुर्ण करण्यात यावेत. तद्नंतर विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन, कुटुंब निवृत्तीवेतन धारकाची प्रथम ओळख तपासणीची कार्यवाही पूर्ण करावी. तथापि, कुटुंब निवृत्तीवेतन धारकाकडून वेगळया निवृत्तीवेतन बँक खात्याची मागणी न करता पूर्वीच्याच संयुक्त बँक खात्याद्वारे कुटुंब निवृत्तीवेतनाचे प्रदान सुरु करावे.

२. यापूर्वीच्या प्रकरणात जेथे कुटुंबनिवृत्तीवेतन स्वतंत्र बँक खात्यात प्रदान करण्यात येत आहे. त्या प्रकरणी सदर कार्यवाही तशी पुढे चालू राहील.

३. ज्या प्रकरणी निवृत्तीवेतन धारकाने संयुक्त बँक खाते उघडलेले नसेल, त्या प्रकरणी कुटुंबनिवृत्ती वेतनधारकाने स्वतंत्र बँक खाते उघडणे अनिवार्य राहील.

४. “निवृत्तीवेतनवाहिनी” या संगणक प्रणालीमध्ये याद्दष्टीने आवश्यक ते बदल करुन सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१११४१५३६३४११०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET
SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249
aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI,
serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b
98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2019.11.14 15:38:39 +05'30'

**(इंद्रजित गोरे)**
**शासनाचे उपसचिव,**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. राज्यपालांचे सचिव.
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८. संचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई,
२९. सह संचालक स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१. निवड नस्ती कोषा प्र.५